सन २०११ -२०१२ मधील एक टक्का जमा वसूलीच्या आधारे जिल्हा परिषदांना देय असलेल्या मुद्रांक शुल्क अनुदान ज्यादा असलेल्या रक्कमासाठी अनुदान मंजूर करणेबाबत.

३६०४- स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे-भारीत-मागणी क्रमांक एल -५- २००- भारित (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १५८ अन्वये जिल्हा परिषदांना मुद्रांक शुल्क अनुदाने. (३६०४०३०७)

महाराष्ट्र शासन

ग्राम विकास व जलसंधारण विभाग

शासन निर्णय क्रमांक-. बीजीटी २०११/प्र.क्र. ५२४७ / वित्त-३, (२४).

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक - १४ सप्टेंबर , २०११.

वाचा : १) महसूल विभागाचे शासन निर्णय , क्रमांक- मुद्रांक २००२/२४/प्र.क्र.३३४/म-१, दिनांक २२ सप्टेंबर, २००३.

२) शासन निर्णय क्रमांक बीजीटी २०११/प्र.क्र५२२८/ वित्त-३ (२४) दिनांक ९ मे २०११

३) शासन निर्णय क्रमांक बीजीटी २०११/प्र.क्र५२२८/वित्त-३(२४)दिनांक १३ जुलै २०११

## शासन निर्णय

महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ मधील कलम १५८ अन्वये जिल्हा परिषदांना एक टक्का मुद्रांक शुल्क अनुदान देय आहे. जिल्हा परिषदांना थेट मुद्रांक शुल्क अदा करण्याबाबतची अधिसूचना दिनांक ११ ऑगस्ट,२००३ च्या शासन राजपत्रात प्रसिध्द करण्यात आली आहे.त्या अनुषंगाने महसूल विभागाने संदर्भाधीन क्रमांक-१ च्या शासन निर्णयानुसार जिल्हा परिषदांना थेट मुद्रांक शुल्क अनुदान वितरणाची सुधारित कार्यपध्दती विहित केली आहे.तथापि सुधारित वितरण कार्यपध्दती मध्ये कोषागारात बिले पारित करण्यास तांत्रिक अडचणी उद्‌भवल्यामुळे जिल्हा परिषदांना मुद्रांक शुल्क अनुदान थेट वितरीत करणे शक्य नाही. त्यामुळे हे अनुदान देता यावे म्हणून सन २०११-२०१२ या वित्तीय वर्षाकरीता रुपये २९०,००,००,०००/- (रुपये दोनशे नव्वद कोटी फक्त ) एवढी अनुदानाची रक्कम मंजूर झाली होती. संदर्भाधिन क्रमांक २ ते ३ च्या शासन निर्णयान्वये रु.२१७,५०,००००० /- इतकी रक्कम सर्व जिल्हा परिषदांना वितरीत करण्यासाठी नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक महाराष्ट्र राज्य पुणे यांच्याकडे सुपुर्द करण्यात आली आहे.

२. आता नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या पत्र क्रमांक का-७ / जिपअ/मु.शु./पु.मा./११/९४३, दिनांक १५/६/२०११ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार जिल्हा परिषदांना देय असलेल्या एक टक्का जमा वसूलीच्या आधारे मुद्रांक शुल्काच्या सन २०११-२०१२ करीता देय मुंद्राक शुल्क अनुदान ज्यादा असलेली रक्कम रु.१५६,७६,०७,१९८/-(एकशे छप्पन कोटी, शहयात्तर लक्ष, सात हजार एकशे अठयान्नव फक्त) साठी विभागाच्या पूरक मागणीच्या प्रस्तावास शासनाकडून व विधी मंडळाकडून मंजूरी प्राप्त झालेली आहे.

३. महाराष्ट्र शासनाच्या वित्त विभागाने राज्य विधीमंडळाच्या माहे ऑगस्ट,२०११ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये उक्त प्रकरणी रु.१५६,७६,०७,१९८/- (एकशे छप्पन कोटी, शहयात्तर लक्ष, सात हजार एकशे अठयाणव फक्त) इतक्या मुद्रांक शुल्क अनुदानाच्या ज्यादा असलेली रकम जिल्हा परिषदांना वितरीत करण्यासाठी पुरवणी मागणीव्दारे उपलब्ध करुन देण्यात आली आहे. सदर रकम सन २०११-२०१२ या वित्तीय वर्षातील जिल्हा परिषदांना देय मुद्रांक शुल्क अनुदानाच्या ज्यादा रकमा वितरीत करण्यासाठी नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहेत. अशा प्रकारे सन २०११-२०१२ मध्ये या शासन निर्णयापर्यत आर्थिक वर्षाकरीता रुपये २१७,५०,००,०००/- आणि पुरवणी मागणीव्दारे जिल्हा परिषदांना देय ज्यादा रकम रु.१५६,७६,०७,१९८/- अशा एकूण रुपये ३७४,२६,०७१९८/-(रुपये तीनशे चौ-याहत्तर कोटी सव्वीस लक्ष, सात हजार एकशे अठयाणव ) इतक्या मुद्रांक शुल्क अनुदानाच्या रकमा नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना मंजूर करण्यात येत आहेत.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या सन २०११-२०१२ मधील देय असलेल्या ज्यादा मुद्रांक शुल्क अनुदानाच्या रक्कमा नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सर्व संबंधीत जिल्हा परिषदांना वाटप करायच्या असून, वितरण आदेशाच्या प्रती शासनाकडे पाठवावयाच्या आहेत. जिल्हा परिषदांना शासन मंजूरी देईल, या अपेक्षेने मंजूर केलेल्या रकमेपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी.

५. ग्राम पंचायतीच्या क्षेत्राधिकारात झालेल्या स्थावर मालमत्तेच्या व्यवहारासंबंधात त्यांना अनुज्ञेय असलेल्या मुद्रांक शुल्क अनुदानाच्या ५०% रक्कम संबंधित जिल्हा परिषदांनी संबंधित ग्राम पंचायतीच्या ग्रामनिधीत जमा करण्याबाबत वर परिच्छेद १ मध्ये नमूद केलेल्या अधिनियमातील नियम १५८ (४) अन्वये असलेली तरतूद तसेच महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या (स्थावर मालमत्तेच्या हस्तांतरणावरील मुद्रांक शुल्क)अधिनियम, १९६१ मधील नियम १० मधील तरतूद विचारात घेऊन, नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य,पुणे यांना या अनुदानाच्या मंजूरी आदेशात आवश्यक त्या अटी व शर्ती यांचा अंतर्भाव करावा.

६. जिल्हा परिषदांना हे अनुदान प्राप्त झाल्यानंतर अनुदान प्राप्त झाल्याचा दिनांक व मिळालेली रक्कम याबाबतची माहिती या विभागाकडे आणि नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडे अनुदानाचे ताळमेळ घालण्यासाठी पाठवावी.

७. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी जिल्हा परिषदांना मंजूर केलेल्या व संबंधित शिर्षाखाली खर्ची पडलेल्या रक्कमेबाबतची माहिती शासन परिपत्रक

,ग्राम विकास विभाग क्रमांक आरसीएन १०८९/प्र.क्र.३०२७/२८, दिनांक ५ सप्टेंबर, १९९० ला जोडलेल्या विहीत प्रपत्रात भरुन या कार्यासनाकडे पाठवावी.

८. या बाबीवर होणारा खर्च मागणी क्रमांक एल-५" ३६०४ स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, २०० इतर संकिर्ण भारीत (एक) महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम,१९६१ च्या कलम १५८ अन्वये जिल्हा परिषदांना मुद्रांक शुल्क अनुदाने (३६०४०३०७)" या लेखाशिर्षाखाली दाखवावा व सन २०११-२०१२ या वित्तीय वर्षासाठी अधिनस्त ठेवलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा. हा शासन निर्णय, प्राप्त झाल्याची पोच हया विभागास पाठविण्यात यावी.

९. यापूर्वी बऱ्याच वेळा काही जिल्हा परिषदांनी वेळीच कोषागारातून रकमा आहरित केलेल्या नव्हत्या हि बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. हि गंभीर बाब विचारात घेता सदरील रक्कमा राज्यातील सर्व जिल्हा परिषदा दि. ३१.३.२०१२ चे आत कोषागारातून आहरित करतील याची खातरजमा आपण करावी. सर्व जिल्हा परिषदांकडून दि.३१.३.२०१२ चे आत या रक्कमा आहरित होणे अत्यंत अनिवार्य आहे. या सर्व बाबीचे गांभीर्य लक्षात घेवून आपण तशी योग्य ती कार्यवाही आपल्यास्तरावरुन करावी असे आपणास सूचीत करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यांत आला असून, त्यांचा संगणक संकेतांक २०११०९१४११५०२६००१ असा आहे.

११. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक- पूरक २०११/प्र.क्र.१४५/ अर्थसंकल्प-३, दिनांक ६ ऑगस्ट २०११ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३०६/व्यय-१५, दि. ६/९/२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( प्रि.शं.कांबळे )
कार्यासन अधिकारी ,महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) नोंदणी,महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य,पुणे,
२) महालेखापाल-१ महाराष्ट्र राज्य,मुंबई,( लेखा व परिक्षण)
३) महालेखापाल-२ महाराष्ट्र राज्य,नागपूर, (लेखा व परिक्षण)
४) महालेखापाल-१ महाराष्ट्र राज्य,मुंबई ,(लेखा व अनुज्ञेयता)
५) महालेखापाल-२ महाराष्ट्र राज्य,नागपूर, (लेखा व अनुज्ञेयता)
६) सर्व विभागीय आयुक्त,
७) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
८) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
९) सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी,(पंचायत)
१०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
११) उपसंचालक लेखा व कोषागारे, कोकण भवन नवी मुंबई बेलापूर /नाशिक /पुणे/औरंगाबाद /अमरावती /नागपूर,
१२) महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई,
१३) वित्त विभाग ( व्यय १५) (बीयुडी-१६) व अर्थोपाय कार्यासन, मंत्रालय,मुंबई,
१४) मुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी लेखा,नवी मुंबई, बेलापूर ,
१५) उप मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा, कोकण भवन/बेलापूर नाशिक/ पुणे/ औरंगाबाद /अमरावती/नागपूर.
१६) कार्यासन क्रमांक-वित्त-१, वित्त-७ व वित्त-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
१७) निवड नस्ती कार्यासन क्रमांक-वित्त-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, १८ ) संगणक कक्ष,ग्रा.वि.वि.

-----------